**पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्प टप्पा-१ करीता बांधकाम कालावधीतील व्याजाची रक्कम अदा करण्यासाठी महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांना निधी वितरीत करण्याबाबत.**
**(सन २०२३-२४)**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पीआरडी-३३२३/प्र.क्र.८६/नवि-७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १८ ऑगस्ट, २०२३.

**संदर्भः-**

१. नगर विकास विभाग शासन निर्णय, क्र. पीएमआर-३३१३/प्र.क्र.२९/नवि-७, दि. २९ ऑक्टोबर, २०१३
२. नगर विकास विभाग शासन निर्णय, क्र. पीएमआर-३३१६/प्र.क्र.१३२/नवि-७, दि. २३ डिसेंबर, २०१६.
३. केंद्र शासनाचे क्र. K-१४०११/११/२०१५-MRTS-IV, दिनांक ९ जानेवारी २०१७ रोजीचे पत्र.
४. नगर विकास विभाग शासन निर्णय, क्र. पीआरडी -३३१७/प्र.क्र.३२/नवि-७, दि. ३१ जुलै, २०१७.
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दि.१२ एप्रिल, २०२३.
६. संचालक, महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. यांचे दि.२१ जून, २०२३ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

पुणे मेट्रो रेल प्रकल्प टप्पा-१ मधील मार्गिका क्रमांक १ (पिंपरी-चिंचवड ते स्वारगेट- लांबी १६.५८९ कि.मी.) व मार्गिका क्रमांक २ (वनाज ते रामवाडी - लांबी १४.६६५ कि.मी.) या रु.११४२० कोटी किंमतीच्या उन्नत व अंशत: भुयारी मेट्रो प्रकल्पाच्या सुधारीत प्रस्तावास केंद्रीय मंत्रीमंडळाने दिनांक ७ डिसेंबर २०१६ रोजी व राज्य मंत्रीमंडळाने दिनांक ८ डिसेंबर २०१६ रोजी मान्यता दिली आहे. त्याअनुषंगाने राज्यशासनाने शा. नि. क्र. पीएमआर-३३१६/प्र.क्र.१३२/नवि-७, दि.२३.१२.२०१६ अन्वये शासनाने मान्यता दिली. केंद्र शासनाने क्र K-१४०११/११/२०१५-MRTS-IV, दिनांक ९ जानेवारी २०१७ च्या पत्रान्वये मान्यता दिली आहे. केंद्रशासनाने पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्पास मान्यता देताना यापूर्वी स्थापन झालेल्या नागपूर मेट्रो रेल्वे कॉर्पोरेशनचे ( केंद्र व राज्य शासनाचा संयुक्त उपक्रम) राज्यस्तरीय महाराष्ट्र मेट्रो रेल्वे कॉर्पोरेशन अशा केद्र व राज्य शासनाचा ५०:५० संयुक्त सहभाग असलेल्या विशेष हेतू वहन कंपनी (SPV) मध्ये परिवर्तन करण्यास तसेच पुणे महानगर मेट्रो रेल प्रकल्प राबविण्यासाठी" महाराष्ट्र मेट्रो रेल कॉपोरेशन लिमिटेड " या केंद्र व राज्य शासनाचा संयुक्त उपक्रम असलेल्या स्पेशल पर्पज व्हेईकल (एस.पी.व्ही.) कंपनीकडे सोपविण्यास मान्यता दिली आहे.

०२. सन २०२३-२४ या वर्षातील अर्थसंकल्पीत मंजूर रक्कम रु. १ कोटी व पुरवणी मागणीद्वारे मंजूर रक्कम रु. १३८ कोटी अशी एकूण रु.१३९ कोटी इतकी रक्कम पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्पाच्या कंपनीस वित्तीय आराखड्याप्रमाणे बांधकाम कालावधीतील व्याज अदा करण्यासाठी महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांना वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्पाच्या वित्तीय आराखड्याप्रमाणे बांधकाम कालावधीतील व्याज अदा करण्यासाठी **सन २०२३-२४** च्या तरतुदींमधून एकूण रु.१३९,००,००,०००/- कोटी **(अक्षरी रुपये एकशे एकोणचाळीस कोटी फक्त)** महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांना प्रदान करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त रक्कम "मागणी क्र. एफ-५, ४२१७ नगरविकासावरील भांडवली खर्च, ८० सर्वसाधारण, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांमधील गुंतवणूका, राज्य योजना (००) (०६) पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्पातील राज्य शासनाचा समभाग, ५४ गुंतवणूक (४२१७०७६६)" या लेखाशिर्षाखाली **सन २०२३-२४** मधील मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची घालण्यात यावी.

३. उपरोक्त लेखाशीर्ष उपयोगात आणण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी, नवि-५, यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच उपसचिव नवि-५, नगर विकास विभाग मंत्रालय मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद -१ मध्ये नमूद करण्यात आलेली रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून काढून ती महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यास देण्यासाठी त्यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. नगर विकास विभागाच्या रोख शाखेने देयक तयार करुन ते अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे पाठवावे. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही नवि- ३१ कार्यासनाने करावी.

४. महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांनी सदर रक्कम रु.१३९ कोटी महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि.कडे जमा झाल्याचे दिनांकासह प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

५. व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांनी सदर रक्कम प्राप्त झाल्याचे व सदर रक्कम ज्या प्रयोजनाकरिता मंजूर केली आहे ती त्याच प्रयोजनाकरिता खर्च केल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावे.

६. सदर निधी वितरण आदेश वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३, दि.१२ एप्रिल, २०२३ मधील संबंधित सर्व अटींचे तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्ठामधील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

७. सदर निधी वितरण आदेश वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.२९७/व्यय-३, दिनांक ०९.०८.२०२३ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०८१८१३०९००२१२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849fee c29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A 1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2023.08.18 16:42:01 +05'30'

(विजय चौधरी)
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव, शहरी विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.

५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. महानगर आयुक्त, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे.
९. व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. नागपूर/पुणे.
१०. महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
११. निवासी अधिदान व लेखा अधिकारी, (लेखा परीक्षा), मुंबई.
१२. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२.
१३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१४. उप सचिव, नवि-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. कक्ष अधिकारी, व्यय-३/अर्थसंकल्प-१६/अर्थसंकल्प-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. कक्ष अधिकारी, कार्यासन १४४४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. कक्ष अधिकारी, नवि-४, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. कक्ष अधिकारी, नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. रोख शाखा (३ प्रती),
२०. निवड नस्ती, नवि-७.